कथा



# काळ्या छत्र्यांच्या त्या देशात

**काळ्या** छत्र्यांचा तो देश तुम्हांला कोणत्याच नकाशावर सहजासहजी सापडला नसता. भिंग घेऊनच शोधावा लागला असता. एक तर तो होता अगदी चिमुकला. त्यात उंच उंच डोंगरांनी वेढलेला. त्या डोंगरांपलीकडे जग असेल असं वाटतच नसे. आकाशाचा वीतभर तुकडा कसाबसा आणि तोही कधी तरी दिसे, कारण तो काळ्या-जांभळ्या ढगांनी सदैव झाकून टाकलेला असे. पाण्यानं तुडुंब भरल्यानं जड झालेल्या पोटाच्या ओझ्यामुळे ढग इतके खाली उतरत, की दिवसचे दिवस डोंगरांची शिखरंही नजरेला पडत नसत. त्या ढगांचं गुरगुरणं, गडगडाट आणि पाठोपाठ थंडगार पाऊस, असं वर्षातले तीनशे बेचाळीस दिवस तरी चालू असे.

वर असे काळे ढग, तर खाली जमिनीवरही सारं तसंच अंधारलेलं, गारठलेलं, काळोखं, गंभीर आणि दुर्मुखलेलं. काळवंडलेले रस्ते, झाडांच्या आणि शेवाळलेल्या घरांच्या एकमेकींत गुंतलेल्या गडद सावल्या, त्यांच्यामधून इकडून तिकडे सरकणाऱ्या, सरपटणाऱ्या काळ्या छत्र्या. ह्या

सगळ्यांमधून माणसं दिसतच नसत. छत्र्यांनाच खाली पाय फुटले आहेत किंवा पायांना वर छत्री उगवली आहे असं वाटे. ताणलेल्या उदास चेहऱ्यांची ती माणसं गडद काळ्या, राखी, तपकिरी रंगांचे गरम कपडे घट्ट लपेटून घेत. डोक्यावर मणामणाचं ओझं ठेवल्यासारखं वागत. कामापुरतंच बोलत; तेदेखील हळूहळू, कानात कुजबुजण्यासारखं. कारणाशिवाय आजूबाजूला बघतही नसत. जो तो कोटाच्या कॉलरमध्ये किंवा शालीच्या वेटोळ्यात मुंडी खुपसून आपापल्या छत्रीत बंदिस्त असे.

पण त्या सकाळी वेगळंच काही घडलं. दिवस तसा नेहमीसारखाच सुरू झाला होता. म्हणजे बाहेर अंधार होताच, पण 'रात्र संपली, सकाळ झाली', असं घड्याळच म्हणत होतं, त्याच्यावर विश्वास ठेवून माणसं कामावर जायला छत्र्या उघडून बाहेर पडली होती. त्यांच्या पावलांचा दबका आवाज आणि पावसाच्या थेंबांची टप टप तेवढी ऐकू येत होती.

अचानक एक तिसरा अनोळखी आवाज आला. माणसं चमकली, थबकली. कोटात आणि शालीत घातलेली डोकी बाहेर काढून एकमेकांकडे संशयाने पाहायला लागली. आवाज रस्त्याच्या त्या टोकाकडून येत होता. तो तरंगत तरंगत जवळ आला. आणखी जवळ आला आणि बध्या माणसांच्या अंगावरून सरकत पुढे रस्त्याच्या दुसऱ्या टोकाशी पोहोचला. एक झकास वळसा घेऊन डावीकडे वळला आणि दिसेनासा झाला. लोक स्तब्ध होऊन आणि डोळे विस्फारून काही क्षण त्या दिशेला बघतच राहिले. नकळत त्यांच्या कपाळांवर आठ्यांचं जाळं उमटलं होतं. मग भानावर येऊन आणि चेहरा नेहमीसारखा उदास करून ते आपापल्या वाटेनं चालू लागले.

झालं एवढंच होतं की, सगळ्यांसारखाच एक जण काळी छत्री घेऊन चालला होता, पण त्यानं सगळ्यांसारखं कोटात डोकं खुपसलेलं नव्हतं. त्यामुळे त्याचा चेहरा सर्वांना दिसत होता. इतकंच नव्हे, तर तो तोंडानं शीळ घालत होता आणि शीळ घालता घालता छान हसतही होता. भरदिवसा भररस्त्यात असं अद्भुत काही पाहण्याची त्या देशातील लोकांना सवय नव्हती.

काही दिवस गेले. मग हाच प्रकार आणखी दोनदा झाला. त्यांपैकी एकदा तर तो शीळवाला सायकलीवरून बिंऽऽग बिंऽऽग झूऽऽम झूऽऽम करत इतक्या वेगानं गेला की, आत्ता नक्की काय झालं हे लोकांना थोडा वेळ कळलंच नाही. 'चक्रमच आहे!' काही जण स्वत:शीच पुटपुटले. बाकीच्यांनी नुसतंच नाक मुरडलं.

नंतरचे काही दिवस शांततेत गेले. झाला प्रकार लोकांच्या आठवणीतून जात चालला असतानाच एक दिवस पुन्हा शीळ ऐकू आली आणि माणसं पुन्हा दचकली. कारण या वेळी शीळ वेगळी होती आणि वाजवणाराही वेगळा होता. एक आजोबा होते ते, डोक्यावरचे बरेचसे केस पांढरे झालेले आणि नाकाखाली झुबकेदार मिशा असलेले. शीळ वाजवताना ते हातातली छत्री गोल गोल फिरवत होते आणि मध्येच हलकीशी उडी मारत होते. बघणाऱ्यांचा आवाज त्या दिवशी मात्र जरासा चढला :

'झालंय काय ह्या लोकांना? आपण कुठं आहोत, काय करतोय, काही भानच नाही!'

'पहा तरी! वय काय ह्यांचं, हसताहेत काय, उड्या काय मारताहेत...'

'लहान मुलंही असं वागत नाहीत. भल्या सकाळी अशी माणसं दिसली ना, की सगळा दिवस वाया जातो.'

छोटी तिशिया आपली छोटी काळी छत्री हातात घेऊन घराच्या पायरीवर उभी होती. तिथून तिनंही

शीळ घालत जाणारे ते आजोबा पाहिले. लोकांची कुजबुज ऐकली. खरं म्हणजे ते हसरे आजोबा तिला आवडले होते. त्यांच्यासारखी शीळ घालता येते का ते पाहायला तिनं तोंडाचा चंबूही केला, पण लोकांचे गुडघ्यापर्यंत लांब झालेले चेहरे पाहून विचार बदलला आणि ती मुकाट्यानं शाळेकडे निघाली.

त्या रात्री डोक्यावरून पांघरूण घेऊन तिशियानं हळूच फूऽऽ फूऽऽ करून बघितलं, पण शीळ काही तोंडातून निघाली नाही. आजोबांचा हसरा चेहरा तिला आठवला. त्यांना कशामुळे इतकं छान हसता येत असेल? पुन्हा कधी दिसले तर विचारावं का? पण लोक म्हणाले तसे ते खरोखरीच चक्रम असले तर? विचार करता करता कधी तरी तिला झोप लागली.

दुसऱ्या दिवशी शाळेत जाता-येता माणसांच्या गर्दीत, तिशियानं त्या आजोबांचा हसरा चेहरा शोधला. हा शोध आणखी तीनचार दिवस चालू राहिला. नंतर तीही पूर्वीप्रमाणे इतर सगळ्यांसारखी आपला गंभीर चेहरा काळ्या छत्रीखाली लपवत रस्त्यातून जायला लागली.

शाळा सुटण्याची वेळ होत आली होती. तिशिया वर्गाच्या खिडकीतून रस्त्याकडे पाहत होती. तास संपण्याची वाट बघत होती. अचानक तिला गोल गोल फिरणारी एक छत्री दिसली. हसरे आजोबा? मग त्या छत्रीखालच्या पायांनी दोन टुण टुण उड्याही मारल्या. तेच ते!

तिशियानं झटकन दप्तर उचललं आणि ती वर्गाबाहेर पळाली. तेवढ्यात घंटा झाली. शिस्तीत रांगेनं बाहेर पडलेल्या मुलामुलींना धक्काबुक्की करत धावत सुटलेल्या तिशियानं, शाळेच्या शिस्तीचे सगळे नियम मोडले आणि ती रस्त्यावर आली. तिनं इकडेतिकडे पाहिलं, पण हसरे आजोबा कुठं दिसेनात. आसपासचे लहानमोठे रस्ते, गल्ल्या पालथ्या घातल्या. डोक्यावरच्या गुरगुरणाऱ्या काळ्या ढगांकडे तिशियाचं लक्षच नव्हतं. आजोबांना शोधता शोधता ती शाळेपासून दूर आली होती.

पाण्याचा एक मोठ्ठा थंडगार थेंब तिच्या नाकावर पडला. मग आणखी एक, आणि सड् सड् सड्, आलाच पाऊस! तिशिया भानावर आली. छत्री? शाळेतच राहिली! परत जायचं तर पुरतं भिजायला होणार. शिवाय, शिस्त मोडली म्हणून उद्या शिक्षा. तिला स्वत:चा राग आला. त्याहून जास्त त्या हसऱ्या आजोबांचा राग आला. 'चक्रम कुठले!' ती दातओठ खात पुटपुटली. मग रस्त्याकडेच्या एका घराच्या वळचणीला उभी राहिली आणि मान खाली घालून पायांभोवती साचलेल्या पाण्यात इवली इवली कारंजी उडवणाऱ्या पावसाच्या थेंबांकडे पाहत राहिली.

"आमच्या छत्रीत येणार का? चांगली मोठ्ठी आहे आमची छत्री," कुणीतरी म्हणालं, चमकून तिशियानं वर पाहिलं. हसरे आजोबा समोर उभे होते.

"छत्री... आहे ना माझी, पण छत्री... शाळेत राहिली...," ती चाचरत म्हणाली.

"असंच होतं," आजोबा हसून म्हणाले, "काही दिवसांपूर्वी मीसुद्धा माझी छत्री विसरलो होतो. तेव्हा ही मिळाली. हवी आहे?"

तिशियानं क्षणभर विचार केला. पाऊस तर पडतोच आहे. तो थांबला की आजोबांना परत देऊन टाकायची छत्री! तिनं पटकन हात पुढं केला. आजोबांच्या हातातली छत्री घेऊन ती आपल्या





डोक्यावर धरली आणि...

आ:ऽऽ! तिचे डोळेच विस्फारले. त्या छत्रीखाली अंधार नव्हताच. छान उबदार ऊन होतं. तिनं वर बघितलं. छत्रीतल्या छोट्याशा निळ्याभोर आकाशात इवलासा सूर्य तरंगत होता. जणू खऱ्या सूर्यानं आपला एक लखलखणारा थेंब तिथं अलगद सोडून दिला होता. चिमुकली रंगीबेरंगी पाखरंही होती तिथं. तिशियानं हळूच छत्री गोल गोल फिरवली, तर गुदगुल्या झाल्यासारखी सगळी पाखरं चिवचिवली. तिशिया एकदम खळखळून हसली. तिनं पुन्हा पुन्हा छत्री गोल फिरवली आणि ती पुन्हा पुन्हा हसत राहिली. कित्येक वर्षांत ती असं हसली नव्हती.

''कुठं मिळते अशी छत्री?'' तिनं आजोबांना विचारलं.

''कुठंच नाही. बाजारात तर मुळीच नाही.''

'मग?'' तिशियानं आश्चर्यानं विचारलं.

''ती आपोआप आपल्याकडे येते. खरंच! फक्त आपण आपला हात पुढे करावा लागतो. तू आत्ता केलास तसा,'' आजोबा हसून म्हणाले.

तिशियाला एकदम आठवण झाली. 'आजोबा, तुम्ही इतकं.. म्हणजे.. असं छान... कशामुळे हसता?'

''तू आत्ता इतकं छान खळखळून कशामुळे हसलीस?''

तिशियानं वर छत्रीकडे पाहिलं आणि ती पुन्हा हसली, 'आता मलासुद्धा सगळे चक्रम म्हणतील, हो नं?' ती छत्री फिरवत म्हणाली, ''पण ही छत्री मी तुम्हांला परत दिल्यावर काय होईल? अं? सांगा नं, आजोबा...''

तिशियानं वळून पाहिलं, तिथं आजोबा नव्हतेच. कुणीच नव्हतं. छत्री तिशियाकडेच राहिली होती, की आजोबांनी ती राहू दिली होती? म्हणजे तिनं छत्री घेण्यासाठी हात पुढे केला आणि त्यांनी देण्यासाठी हात पुढे केला, असं? म्हणजे आता आजोबांकडे छत्री नसली तरी ते छान हसतच राहतील, असं? तसंच असेल.

तिशियानं तोंडाचा चंबू केला. एक गोड शीळ तिच्या तोंडातून निघाली आणि छत्रीतली पाखरं आनंदानं चिवचिवली.

**–माधुरी पुरंदरे**